**औद्योगिक प्रशिक्षण संस्थां मध्ये सैध्दांतिक व प्रात्यक्षिक (Theory & Practical) तासिका घेण्यासाठी तासिका तत्वावर नियुक्त केलेल्या निदेशकांच्या मानधनात वाढ करणे बाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**कौशल्य विकास व उद्योजकता विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः आयटीसी-२०१५/प्र.क्र.१४६/व्यशि-३,**

मंत्रालय विस्तार भवन, मादाम कामा मार्ग,

हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई ४०० ०३२.

दिनांक : १५ नोव्हेंबर, २०१८.

**संदर्भ :-**

१) शासन निर्णय, उच्च व तंत्र शिक्षण विभाग,क्र.आयटीआय-२००९/(प्र.क्र. १३८/०९)/व्यशि-३, दि. ०१/०६/२०१०.

२) शासन निर्णय, उच्च व तंत्र शिक्षण विभाग,क्र. आयटीआय-२०१०/प्र.क्र.६४/व्यशि-३, दि. २६/०७/२०१०.

३) संचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे पत्र क्र. प्र.संचा.(प्रशि.)/तासिका मानधन/२०१५/५० दि. ०६/०५/२०१५.

४) संचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे पत्र क्र. ०७/व्यशिप्र/मानधनवाढ/२०१८/४५, दि. १९/०१/२०१८.

**प्रस्तावना :**

औद्योगिक क्षेत्रातील जागतिकीकरण विचारात घेता, कुशल मनुष्यबळाची गरज वाढलेली आहे. त्यास अनुसरून औद्योगिक प्रशिक्षण संस्थांमधून शिल्पकारागीर योजनेसोबत विविध योजना राबविण्यात येत आहेत. तसेच आधुनिक तंत्रज्ञानावर आधारित व्यवसाय अभ्यासक्रम सुरू करण्यात येत आहेत. औद्योगिक प्रशिक्षण संस्थांमध्ये उपलब्ध असलेल्या साधनसामुग्रीचा व प्रशिक्षण सुविधांचा महत्तम वापर करून दुसऱ्या व तिसऱ्या पाळीतून व्यवसाय अभ्यासक्रमाच्या तुकडया सुरू करण्यात येवून प्रशिक्षणाच्या संधी वाढविण्यात येत आहेत. तसेच महापालिका क्षेत्रातील औद्योगिक प्रशिक्षण संस्थांमध्ये दुसरी/तिसरी पाळी सुरू करण्याचा व महापालिका क्षेत्राबाहेरील औद्योगिक प्रशिक्षण संस्थांमध्ये दुसरी पाळी सुरू करण्याचा निर्णय संदर्भाधिन (१) येथील शासन निर्णयान्वये घेण्यात आलेला आहे.

प्रशिक्षणार्थ्यांना उत्कृष्ट दर्जाचे प्रशिक्षण देण्यासाठी प्रशिक्षित व अनुभवी निदेशक उपलब्ध करून देणे आवश्यक आहे. त्यादृष्टीने वेळोवेळी भरतीची कार्यवाही करण्यात येते. तथापि, तातडीच्या प्रसंगी व भरतीच्या कार्यवाहीस लागणाऱ्या कालावधीत प्रशिक्षणार्थ्यांचे प्रशिक्षणाचे नुकसान होवू नये म्हणून तासिका तत्वावर निदेशकांची तात्पुरती नेमणूक करून पर्यायी व्यवस्था करणे क्रमप्राप्त ठरते. सदर नियुक्त केलेल्या निदेशकांना शासनाच्या संदर्भाधिन (२) येथील शासन

निर्णया अन्वये सैध्दांतिक तासिकेसाठी रू. ७२/- व प्रात्यक्षिक तासिकेसाठी रू. ३६/- प्रति तासिका याप्रमाणे मानधन देण्यात येते. तथापि, नियमित कर्मचाऱ्यांच्या तुलनेत व शिक्षकीय पदांची शैक्षणिक अर्हताधारण करणाऱ्या उमेदवारांना खाजगी आस्थापनां मध्ये मिळणाऱ्या वेतनाच्या तुलनेत तासिका तत्वावरिल निदेशकांना अदा करण्यात येणारे मानधन फारच कमी असल्याने, विशेषत: ग्रामिण भागातील औद्योगिक प्रशिक्षण संस्थां करिता तासिका तत्वावर नियुक्ती करिता विहित शैक्षणिक अर्हता व अनुभव धारण करित असलेले उमेदवार इच्छुक नसतात. तसेच नियुक्त केलेल्या उमेदवारां पैकी बरेच उमेदवार नियुक्तीनंतर काही कालावधीतच प्रशिक्षणाचे काम सोडून जातात. परिणामी प्रशिक्षणार्थ्यांचे शैक्षणिक नुकसान होते. त्या अनुषंगाने औद्योगिक प्रशिक्षण संस्थांमधील सैध्दांतिक व प्रात्यक्षिक तासिका घेण्यासाठी तासिका तत्वावर नियुक्त करावायाच्या शिल्प निदेशक, गणित निदेशक, चित्रकला निदेशक तसेच गणित व चित्रकला निदेशकांच्या सैध्दांतिक तासिकेच्या मानधनात रू.७२/- वरून रू. २५०/- प्रती तासिका व प्रात्यक्षिक तासिकेच्या मानधनात रू. ३६/- वरून रू. १२५/- प्रती तासिका याप्रमाणे सुधारणा करण्याबाबतचा प्रस्ताव संचालक (व्यशि व प्रशि) यांच्या संदर्भाधिन (३) व (४) येथील पत्रान्वये प्राप्त झालेल्या प्रस्तावास मान्यता देण्याबाबतची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**<u>शासन निर्णय :-</u>**

औद्योगिक प्रशिक्षण संस्थांमध्ये सैध्दांतिक व प्रात्यक्षिक तासिका घेण्यासठी नेमणूक करण्यात येणाऱ्या तासिका तत्वावरील शिल्प निदेशक, चित्रकला निदेशक, गणित निदेशक आणि गणित व चित्रकला निदेशक यांच्या मानधनात खालीलप्रमाणे वाढ करण्यास शासन मंजूरी देण्यात येत आहे:-

| अ.क्र. | तपशिल | विषय | मानधनाचा दर प्रति तासिका |
|---|---|---|---|
| १. | औद्योगिक प्रशिक्षण संस्थांमध्ये सैध्दांतिक व प्रात्यक्षिक तासिका घेण्यासठी नेमणूक करण्यात येणाऱ्या तासिका तत्वावरील शिल्प निदेशक, चित्रकला निदेशक, गणित निदेशक आणि गणित व चित्रकला निदेशक यांच्या मानधनाचे दर | सैध्दांतिक | रू.२५०/- |
| | | प्रात्यक्षिक | रू.१२५/- |

**वरिल मानधनाचे दर पुढील अटींच्या अधिन राहून मंजूर करण्यात येत आहेत:-**

अ) तासिका तत्वावरील निदेशकांची नियुक्ती आवश्यक ती सर्व छाननी करून संबंधित प्राचार्यांनी करावी. तासिका तत्वावर, तात्पुरत्या स्वरूपात, निदेशक या पदांवर नेमणूक करावयाच्या उमेदवारांनी त्या पदांसाठी आवश्यक असलेली शैक्षणिक व अनुभवाची अर्हता धारण करणे आवश्यक आहे.

आ) तासिका तत्वावर नेमणूक केल्या जाणाऱ्या निदेशक पदांस मिळणारे मासिक मानधन हे नियमित निदेशकांच्या वेतनाएवढे होणार नाही एवढयाच तासिका देण्यात याव्यात.

इ) तासिका तत्वावर नेमण्यांत येणाऱ्या निदेशकांकडून ते तासिका तत्वावर काम केल्याचा आधार घेवून नियमित नेमणूकीसाठी कुठलाही हक्क मागणार नाहीत असे हमीपत्र घेवून नेमणूक करण्यात यावी, तसेच नियुक्तीच्या आदेशातही स्पष्टपणे नमूद करावे.

ई) ज्या वेळी नियमित स्वरूपात कंत्राटी पध्दतीवर निदेशकांची नियुक्ती होईल त्यावेळीस तासिका तत्वावरील निदेशकांच्या सेवा तात्काळ बंद करण्यात येतील.

उ) तासिका तत्वावरील निदेशकांचे कामकाज असमाधानकारक असल्यास, त्यांची तासिका तत्वावरील सेवा तात्काळ संपुष्टात येईल. अशा परिस्थितीत संबंधित प्राचार्यांने तात्काळ तासिका तत्वावरील पर्यायी व्यवस्था करावी.

ऊ) वरिल मानधनातील वाढ शासन निर्णयाच्या दिनाकांपासून अनुज्ञेय राहील.

ऋ) याकरिता होणारा खर्च खालील लेखाशिर्षामधील मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा:-.

१. कौशल्य विकास व उद्योजकता विभाग, मागणी क्रमांक झेडए-२,२२३० कामगार व सेवायोजन, ०३ प्रशिक्षण, ००३ कारागिर व पर्यवेक्षक यांचे प्रशिक्षण,(०२) कारागिरांचे तांत्रिक व व्यवसायिक प्रशिक्षण, (०२)((०१) कारागिरांचे तांत्रिक व व्यवसायिक प्रशिक्षण (अनिवार्य) (२२३० ए०३१) ०१- वेतन

२. कौशल्य विकास व उद्योजकता विभाग, मागणी क्रमांक झेडए-२, २२३० कामगार व सेवायोजन, १०२ शिकाऊ उमेदवारींचे प्रशिक्षण, (०१) शिकाऊ उमेदवारीचे प्रशिक्षण, (०१)(०१) शिकाऊ उमेदवारांबाबत अधिनियम १९६१ अन्वये शिकाऊ उमेदवारांचे प्रशिक्षण (अनिवार्य), २२३० ए०४९ (०१) वेतन

३. कौशल्य विकास व उद्योजकता विभाग, मागणी क्रमांक झेडए-२, २२३० कामगार व सेवायोजन, ०३ प्रशिक्षण, ००३ कारागिर व पर्यवेक्षक यांचे प्रशिक्षण, (०१) शासकीय औद्योगिक प्रशिक्षण कार्यशाळा, (०१)(०१) शासकीय औद्योगिक प्रशिक्षण कार्यशाळा (अनिवार्य) (२२३० ए०५८) ०१- वेतन

४. अल्पसंख्यांक विकास विभाग, मागणी क्रमांक झेडई-१, २२३५ सामाजिक सुरक्षा व कल्याण, ०२, समाज कल्याण, २०० इतर कार्यक्रम, (००)(१६) अल्पसंख्यांक विद्यार्थ्यांसाठी विद्यमान औद्योगिक प्रशिक्षण संस्थेमध्ये दुसरी व तिसरी पाळी सुरू करणे (२२३५ए५३४) ०१- वेतन

५. कौशल्य विकास व उद्योजकता विभाग, मागणी क्रमांक झेडए-२, २२३० कामगार व सेवायोजन, ०३ प्रशिक्षण, ००३ कारागिर व पर्यवेक्षक यांचे प्रशिक्षण, (०२)

कारागिरांचे तांत्रिक व व्यवसायिक प्रशिक्षण, (०२)(१२) अतिरेकी कारवाईग्रस्त जिल्हयातील युवकांसाठी कौशल्य विकास कार्यक्रम (राज्य हिस्सा) (कार्यक्रम), (२२३० ए२४५) ०१- वेतन

६. कौशल्य विकास व उद्योजकता विभाग, मागणी क्रमांक झेडए-२, २२३० कामगार व सेवायोजन, ०३ प्रशिक्षण, ००३ कारागिर व पर्यवेक्षक यांचे प्रशिक्षण, (०२) कारागिरांचे तांत्रिक व व्यवसायिक प्रशिक्षण, (०२)(८) प्रवेश क्षमता वाढविण्यासाठी औद्योगिक प्रशिक्षण संस्थांचा विस्तार करणे (कार्यक्रम), (२२३० ए२०९) ०१- वेतन

७. सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मागणी क्रमांक N-३, २२२५ अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती इतर मागासवर्ग व अल्पसंख्यांक यांचे कल्याण, २७७ शिक्षण, ०१ वसतीगृहे (०१)(०४) अनुसूचित जातीतील मुले व मुली यांच्या करीता विभागीय स्तरावर औद्योगिक प्रशिक्षण संस्था सुरू करणे (२२२५ ४१०४) ०१-वेतन

८. आदिवासी उपयोजना (जिल्हा योजना) व आदिवासी सार्वत्रिकीकरण (जिल्हा योजना) या योजनांच्या संदर्भांत संबधित जिल्हयाच्या मागणी क्रमांकाअंतर्गत २२३० कामगार व सेवायोजन या प्रधान लेखाशिर्षांखालील मंजूर निधीतून खर्च करण्यात येईल.

सदर शासन निर्णय अल्पसंख्यांक विकास विभाग, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, आदिवासी विकास विभाग यांच्या सहमतीने व वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्रमांक २५३/व्यय-६ दि. १४/११/२०१८ अन्वये दिलेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८१११५१६०५०५५३०३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sakharam
Dina Kharat

Digitally signed by Sakharam Dina Kharat
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Skill Development and Entrepreneurship Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=34e795101cfc08377272f409bc9348c5d84ec89bc33bd49bcb71e896a5e56b29, serialNumber=eb1cb39de10fe09852a24a5fa63add6d5b204146d3716e740e20fb4b2a378a55, cn=Sakharam Dina Kharat
Date: 2018.11.26 15:18:08 +05'30'

**( स.दि. खरात )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत :-**

१. मा. राज्यपाल, महाराष्ट्र राज्य यांचे सचिव,
२. मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव,
३. सर्व संबंधित मा. मंत्री, यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
४. सर्व संबंधित मा. राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
५. मा. विरोधी पक्षनेता, विधानपरिषद/विधानसभा यांचे खाजगी सचिव, विधान भवन, मुंबई
६. सर्व विधानमंडळ सदस्य, महाराष्ट्र राज्य,

७. मा. मुख्य सचिव यांचे उप सचिव, मुख्य सचिवांचे कार्यालय, मंत्रालय, मुंबई
८. सर्व मंत्रालयीन विभागाचे अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव, मंत्रालय, मुंबई
९. उप सचिव (व्यशि), कौशल्य विकास व उद्योजकता विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई
१०.महालेखापाल (लेखा परीक्षा), महाराष्ट्र १/२, मुंबई/ नागपूर.
११.महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/ नागपूर.
१२.संचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य,मुंबई
१३.सर्व सहसंचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण प्रादेशिक कार्यालय, (संचालनालयामार्फत)
१४.अधिदान व लेखा अधिकारी, अधिदान व लेखा कार्यालय, मुंबई.
१५.सर्व संबंधित जिल्हा कोषागार अधिकारी (संचालनालयामार्फत)
१६.सर्व संबंधित जिल्हा व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण अधिकारी यांचे कार्यालय. (संचालनालयामार्फत)
१७.सर्व संबंधित प्राचार्य, औद्योगिक प्रशिक्षण संस्था (संचालनालयामार्फत)
१८. नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई
१९.वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
२०.निवड नस्ती (व्यशि-३), कौशल्य विकास व उद्योजकता विभाग, मंत्रालय, मुंबई.